**विधानमंडळाच्या डिसेंबर २०१४ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागण्यांद्वारे मंजूर झालेल्या तरतुदी प्रशासकीय कार्यासने / नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बीयुडी १४१४/ प्र.क्र. १९१/ नवि-४**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १३.१.२०१५

**वाचा:**

१) शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्रमांकः वानियो २०१४/ प्र.क्र. ९४/ नवि-४, दि. २१.७.२०१४
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः पूरक-२०१४/ प्र.क्र. ५८९/ अर्थसंकल्प-३, दि. १.१.२०१५

**परिपत्रक:**

सन २०१४-१५ या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दि. ८.१२.२०१४ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास विधानसभेने मान्यता दिल्यानंतर, दि. ३१.३.२०१५ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन अधिनियम, २०१४ ( सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३९) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि. २३.१२.२०१४ यामध्ये प्रसिद्ध करण्यात आला आहे.

२. उपरोक्त पुरवणी विनियोजन अधिनियमाद्वारे चालू आर्थिक वर्षी या विभागास एकूण रू. २२५,१०,५०,०००/- (रूपये दोनशे पंचवीस कोटी दहा लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेच्या पुरवणी खर्चास मान्यता मिळाली आहे. वित्त विभागाने संदर्भाधीन क्र. २ येथील परिपत्रान्वये पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमांचे आवश्यकतेनुसार वाटप करण्याविषयी कळविले आहे. त्याअनुषंगाने अर्थसंकल्पीय वर्ष २०१४-१५ साठी सोबतच्या विवरणपत्रातील निर्देशित केलेल्या स्तंभ क्र. ४ मधील तरतुदीच्या रकमा स्तंभ क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या प्रशासकीय कार्यासन / नियंत्रक अधिकाऱ्यांकडे याद्वारे सुपूर्द करण्यात येत आहेत.

३. संबंधित प्रशासकीय कार्यासनांनी / नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे सुपूर्द केलेल्या पूरक अनुदानाचा पूर्णत: विनियोग करण्यासाठी आवश्यक कार्यवाही तात्काळ करावी. ज्या बाबीसंदर्भात लाक्षणिक पूरक मागणी सादर करण्यात आली असेल त्यासंदर्भात पुनर्विनियोजनाचे प्रस्ताव त्वरित सादर करण्यात यावेत. तसेच वित्तीय अधिकाराच्या प्रत्यायोजनानुसार प्रत्यक्ष निधी वितरणापूर्वी

आवश्यक तेथे नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी. याचबरोबर पूरक मागणी जर काही अटी व शर्तींच्या अधीनतेने अर्थसंकल्पित करण्यात आली असेल तर त्या अटींच्या पूर्ततेसह पूरक मागण्यांच्या मूळ धारिका वित्त विभागाकडे सादर करण्यात याव्यत.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक 201501091610213725 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Hanmant Padhye

Digitally signed by Rajesh Hanmant Padhye
DN: CN = Rajesh Hanmant Padhye, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.01.13 11:20:27 +05'30'

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, लेखा व अनुज्ञेयता, नागपूर
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, लेखा परीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, लेखा परीक्षा, नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प-१६/ व्यय-३) मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.कक्ष अधिकारी (नवि-३३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.कक्ष अधिकारी (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवडनस्ती (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. बीयुडी १४१४/ प्र.क्र. १९१/ नवि-४, दि. १३.१.२०१५ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | पूरक मागणी व पूरक मागण्यांच्या पुस्तकातील पृष्ठ क्र. व बाब क्र. | अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष | पूरक अनुदानाची रक्कम (रू. हजारात) | ज्या बाबीकरिता पूरक मागणी व विनियोजन मंजूर करण्यात आले आहे त्याचा तपशील व विषय | अनुदान सुपूर्द करण्यात आलेले प्रशासकीय कार्यासन व संबंधित नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | पृष्ठ क्र. ७० बाब क्र. ९८ | २२१७, नगर विकास<br>०३, लहान व मध्यम शहरांचा एकात्मिकृत विकास<br>१९१, महानगरपालिकांना सहाय<br>(००)(०१) जागतिक पर्यावरण सुविधा याअंतर्गत कायमस्वरूपी नागरी परिवहन प्रकल्पाकरिता पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिकांना संनियंत्रण सहाय (योजनांतर्गत) (दत्तमत) (२२१७८१७३)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | २,००,०० | पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिकांच्या कायमस्वरूपी नागरी परिवहन प्रकल्पाकरिता, भारत सरकारमार्फत, जागतिक बँकेकडून अनुदान दिले जाते. या अनुदानापोटी चालू वर्षी रू. २ कोटी वितरित होणे अपेक्षित आहे. | नवि-३३<br>संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय |
| २ | पृष्ठ क्र. ७० बाब क्र. ९९ | २२१७, नगर विकास<br>८०, सर्वसाधारण<br>१९१, स्थानिक संस्था, | १०८,००,०० | महानगरपालिका क्षेत्रामध्ये पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी रू. | नवि-४<br>संबंधित जिल्हाधिकारी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, शहर सुधार मंडळे इत्यादींना सहाय<br>(००)(०१), महानगरपालिका क्षेत्रामध्ये पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी विशेष तरतूद (२२१७०९१३) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | | १०८,००,००,०००/- इतकी पूरक मागणी मंजूर करण्यात आली आहे. | |
| ३ | पृष्ठ क्र. ७०<br>बाब क्र. ९९ | २२१७, नगर विकास<br>८०, सर्वसाधारण<br>१९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, शहर सुधार मंडळे इत्यादींना सहाय<br>(००)(०७), नागपूर नागरी परिवहन (मेट्रो) प्रकल्पासाठी नागपूर सुधार प्रन्यासला सहय (२२१७९५८१) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | १२,०० | नागपूर नागरी परिवहन (मेट्रो) प्रकल्पासाठी नागपूर सुधार प्रन्यासला सहय | नवि-७<br>उप सचिव (नवि-७) |
| ४ | पृष्ठ क्र. ७०<br>बाब क्र. ९९ | २२१७, नगर विकास<br>८०, सर्वसाधारण | ५५,८५,०० | सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व | नवि-१६<br>जिल्हाधिकारी, |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, शहर सुधार मंडळे इत्यादींना सहाय<br>(००)(०२), सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व कार्यान्वयन खर्च (२२१७९६३४) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | | कार्यान्वयन खर्च भागविण्यासाठी रू. ५५,८५,००,०००/- रकमेची पूरक मागणी मंजूर करण्यात आली आहे. | नाशिक |
| ५ | पृष्ठ क्र. ७१<br>बाब क्र. १०० | २२३०, कामगार व सेवायोजन<br>०२, सेवायोजन सेवा<br>१०१, सेवायोजन सेवा<br>०३, नागरी सेवायोजन सेवा व उपजिविका कार्यक्रम<br>(राज्य योजनांतर्गत योजना)<br>(०३)(०३) राज्य नागरी उपजिविका अभियान (२२३०६०६५) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>०१, वेतन ... १<br>०६, दूरध्वनी,वीज व पाणी शुल्क १<br>११, देशांतर्गत प्रवास खर्च १ | ३८,००,०० | राज्य नागरी उपजिविका अभियानाच्या अंमलबजावणीसाठी पूरक मागणीद्वारे रू. ३८,००,००,०००/- ची तरतूद करण्यात आली आहे. | नवि-३३<br>संचालक, नगरपालिका प्रशासन |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | १३, कार्यालयीन खर्च १<br>३१, सहायक अनुदान ३७,९९,९६<br>(वेतनेतर) | | | |
| ६ | पृष्ठ क्र. ७१<br>बाब क्र. १०१ | ३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे<br>(००)(२००) इतर संकीर्ण नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा<br>(००)(०२) यात्रा कर रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहायक अनुदान (३६०४०१४७) (योजनेतर) (दत्तमत)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | ४,१३,५० | यात्राकराऐवजी सहायक अनुदानास हक्कदार असलेल्या नगरपरिषदांना अनुदानासाठी अतिरिक्त तरतूद | नवि-४<br>संचालक, नगरपालिका प्रशासन |
| ७ | पृष्ठ क्र. ७१<br>बाब क्र. १०२ | ४२१७, नगर विकास<br>८०, सर्वसाधारण<br>१९२, नगरपालिका / नगरपरिषदांना सहाय<br>(००)(०८) वैशिष्टयपूर्ण कामांसाठी नगरपरिषदांना विशेष अनुदान (४२१७०६०३) (योजनांतर्गत) | १७,००,०० | नगरपरिषदांना त्यांच्या क्षेत्रामध्ये वैशिष्ट्यपूर्ण विकास कामे करण्याकरिता सहाय करण्यासाठी विशेष अनुदान | नवि-४<br>संबंधित जिल्हाधिकारी |

